**महसूल विभागाच्या विविध कार्यालयांच्या आस्थापनांवरील आकृतीबंधाबाहेरील एकूण ७२२ अस्थायी पदांना दिनांक ०१/०३/२०२५ ते दिनांक ३१/०८/२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः इएसटी-२०२४/प्र.क्र.३४/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०१ एप्रिल, २०२५.

**संदर्भ:-**

१) महसूल व वन विभाग,शासन निर्णय,क्र.संकीर्ण १००२/प्र.क्र.६६(भाग-२)/ई-८,दि.२०/०३/२००६.
२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय,क्र.प्राफेब २०१०/प्र.क्र.२६/पुनर्बांधणी-३/म-१०, दि.३०/०७/२०१३
३) महसूल व वन विभाग,शासन निर्णय, क्र.उविका-२०१६/प्र.क्र.१५/म-१०,दि.३०/०४/२०१६ (तीन शासन निर्णय)
४) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र.ईएसटी-२०१७/प्र.क्र.३१/ई-८,दि.२६/०४/२०१७.
५) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.३१/०८/२०२३ व शासन शुध्दिपत्रक,दि.०६/०९/२०२३.
६) महसूल व वन विभाग, शासन निर्णय,क्र. ईएसटी-२०२२/प्र.क्र.५२/ई-८,दि.२०/०९/२०२३
७) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.२१/०२/२०२४.
८) महसूल व वन विभाग, शासन निर्णय,क्र. ईएसटी-२०२४/प्र.क्र.३४/ई-८,दि.२२/०३/२०२४.
९) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि. ०६/०९/२०२४.
१०) महसूल व वन विभाग, शासन निर्णय,क्र. ईएसटी-२०२४/प्र.क्र.३४/ई-८,दि.२७/०९/२०२४
११) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३/०३/२०२५.

**प्रस्तावना :-**

विभागीय आयुक्त कोकण विभाग, पुणे विभाग, नाशिक विभाग, अमरावती विभाग, छत्रपती संभाजीनगर विभाग, नागपूर विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील विविध क्षेत्रिय कार्यालयांच्या आस्थापनेवरील आकृतीबंधाबाहेरील ७२२ अस्थायी पदांना संदर्भाधीन वित्त विभाग,शासन निर्णय, दि.०३/०३/२०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन दिनांक ०१/०३/२०२५ ते दिनांक ३१/०८/२०२५ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

विभागीय आयुक्त कोकण विभाग, पुणे विभाग, नाशिक विभाग, अमरावती विभाग, छत्रपती संभाजीनगर विभाग,नागपूर विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील विविध क्षेत्रिय कार्यालयांच्या आस्थापनेवरील आकृतीबंधाबाहेरील संदर्भाधीन क्र.०४ येथील शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्रामधील ७२२ अस्थायी पदांना दिनांक ०१/०३/२०२५ ते दिनांक ३१/०८/२०२५ या कालावधीसाठी वित्त विभाग, शासन निर्णय, दि.०३/०३/२०२५ रोजीच्या शासन निर्णयातील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सदर अस्थायी पदांवर होणारा खर्च संदर्भाधीन क्र.०४ येथील शासन निर्णयासोबतच्या संबंधित विवरणपत्रातील रकाना- क्र.०५ मध्ये दर्शविलेल्या लेखाशिर्षाखालील सन २०२५-२०२६ साठी मंजूर झालेल्या अर्थसंकल्पिय अनुदानातून भागविण्यात यावा.

३. वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०३/०३/२०२५ च्या शासन निर्णयात दरम्यानच्या काळात सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेणे आवश्यक असल्याचे तसेच यानंतर सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्याकरीता कालावधी वाढवून देण्यात येणार नाही, याची सर्व विभागांनी नोंद घेण्याबाबत वित्त विभागाने निर्देशित केले आहे.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३/०३/२०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२५०४०११५२०५०५४१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ

Digitally signed by SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=559498df564ab1121a356349085c1b8e3cc0f12569ba0f7f2090386d4dccb333, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F7145AF5949FB706E2DCB06C2B209B58FFA369F6E085E02041722C90F0528791, cn=SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
Date: 2025.04.01 15:21:39 +05'30'

**( सत्यनारायण बजाज )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त (सर्व)
२) जिल्हाधिकारी (सर्व)

३) अपर जिल्हाधिकारी,अंबाजोगाई, जिल्हा बीड/मालेगाव, जिल्हा नाशिक/अहेरी,जिल्हा गडचिरोली/जव्हार, जिल्हा-पालघर

४) अपर तहसिलदार, पिंपरी- चिंचवड, जिल्हा पुणे/गोंदिया/ छत्रपती संभाजीनगर /माथेरान गिरीस्थान जि. रायगड/धुळे शहर/पिंपळनेर, जिल्हा धुळे/दोंडाईचा,जि. धुळे

५) प्रशासक, उल्हासनगर शहर वसाहत पुनर्वसन विभाग ( संबंधित जिल्हाधिकारी यांच्यामार्फत)

६) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखापरीक्षा) १/२, महाराष्ट्र, मुंबई /नागपूर.

७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

८) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व )

९) सहसचिव/उप सचिव, कार्यासन (व्यय-९/आ.पु.क,), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.

१०) सह सचिव, (कार्यासन ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.

११) उप जिल्हाधिकारी, मराठवाडा महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी, छत्रपती संभाजीनगर.

१२) निवड नस्ती, (कार्यासन ई-८), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.